**राज्यातील सहा आदिवासी जिल्हयात पाळणाघरांची योजना सुरू करणे बाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बालविकास विभाग**
शासन निर्णय क्रमांक एबावि-२०१०/ प्र.क्र. १२७ / का-५
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २ जानेवारी , २०१२

**प्रस्तावना :** एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत अंगणवाडी केंद्रामध्ये सध्या फक्त ३ ते ६ वर्ष वयोगटातील मुलांना प्रवेश दिला जातो. परंतु ६ महिने ते ३ वर्षे वयोगटातील मुले अंगणवाडीत येत नाहीत. त्यांना घरपोच आहार पुरविण्यात येतो. त्यांची काळजी घेण्यासाठी कोणतीही यंत्रणा नसल्यामुळे अशा मुलांकडे दुर्लक्ष होवून ती कुपोषित होतात. साधारणतः कामावर जाणारे पालक अशा मुलांना घरी सोडून जातात किंवा इतर मोठया मुलांच्या जवळ सोडून जातात, त्यामुळे शाळा गळतीचेही प्रमाण वाढते. या सर्व अडीअडचणी विचारात घेऊन अंगणवाडी केंद्रामार्फत ज्या सेवा पुरविणे शक्य होत नाही, अशा सेवा पुरविण्यासाठी म्हणजेच सध्या पुरविण्यात येणा-या सेवांमधील पोकळी (gap) भरून काढण्यासाठी ठाणे, नाशिक, नंदुरबार, अमरावती, गडचिरोली आणि चंद्रपूर या सहा आदिवासी जिल्हयातील ६ महिने ते ३ वर्ष वयोगटातील बालकांसाठी दिवसात ८ तास पाळणाघर ही स्वतंत्र योजना राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

**शासन निर्णयः** ६ महिने ते ३ वर्ष वयोगटातील मुलांसाठी दिवसातून ८ तास पाळणाघराची योजना पहिल्या टप्प्यात ठाणे, नाशिक, नंदुरबार, अमरावती , गडचिरोली आणि चंद्रपूर या सहा जिल्हयामध्ये प्रत्येकी १०० प्रमाणे ६०० पाळणाघरे आदिवासी उपयोजनाक्षेत्रातील गावांमध्ये सुरू करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

सदर योजना जिल्हा परिषदेच्या नियंत्रणाखाली ग्रामपंचायती मार्फत राबविण्यात यावी. पाळणाघर दर दिवशी ८ तास चालविण्यात यावे. पाळणाघरे सुरू करण्यात येत असल्याबाबत जिल्हा परिषदेने प्रसिध्दी दयावी.

**१) गावपातळीवर ठराव :-** ग्रामपंचायतीच्या लगेच येणा-या पुढील महिला ग्रामसभेमध्ये पाळणाघराचा विषय घेण्यात यावा आणि महिला सदस्या व स्थानिक माता यांच्या एकत्रित बैठकीत पाळणाघराची वेळ व जागा निश्चित करण्यात यावी. सर्वात वरिष्ठ ग्रामपंचायतीच्या महिला सदस्य यांच्या अध्यक्षतेखाली सदर

बैठक आयोजित करण्यात यावी. अंगणवाडीत पुरेशी जागा असल्यास स्थान निश्चिती करताना त्यास प्राधान्य देण्यात यावे. अंगणवाडीत जागा उपलब्ध नसल्यास इतर उपयुक्त जागेची निवड करण्यात यावी. मात्र त्यात शौचालय, पाण्याची सोय व स्वयंपाकाची व्यवस्था असणे आवश्यक असेल.

सदर बैठकीत ३ वर्षापर्यंतची किती मुले व किती मातांनी (किती मुलांसाठी) पाळणाघराची मागणी केली आहे, याबाबतची नोंद करून त्याबाबतचा ठराव करावा व सर्व ठराव दिनांक ३१.१.२०१२ पर्यंत जिल्हा परिषदेकडे संकलित करावेत. जिल्हा परिषदेने दिनांक ७.२.२०१२ पर्यंत पाळणाघराची जास्तीत जास्त मागणी असलेल्या गावांची निवड करून त्याबाबतचे आदेश निर्गमित करावेत व त्याप्रमाणे आयुक्त, महिला व बाल विकास , पुणे यांना कळवावे. म्हणजे प्रत्येक जिल्हयातून ज्या १०० गावात (किमान १५) जास्तीत जास्त मुलांची नोंद असेल त्यांची निवड करावी. फक्त आदिवासी उपयोजनेत मोडत असलेल्या गावांची निवड करावी. तत्पुर्वी तसे प्रमाणपत्र संबंधित प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास विभाग यांचे कडून प्राप्त करून घ्यावे.

माहे फेब्रुवारी २०१२ अखेरपर्यंत ग्रामपंचायतीने जागेची व ठरवून दिलेल्या निकषानुसार प्रत्येक पाळणाघरासाठी चांगले काम करणा-या दोन स्थानिक महिलांची निवड करावी. त्यांच्या अनुपस्थितीत काम करण्यासाठी पर्यायी व्यवस्था म्हणून प्रतिक्षा यादीवर दोन महिलांची निवड करण्यात यावी. प्रतिक्षा यादीवरील महिलांच्या मानधनासाठी स्वतंत्र तरतूद करण्याची आवश्यकता नाही. अनुपस्थित राहीलेल्या महिलेच्या मानधनातील रकमेमधून अनुपस्थितीच्या दिवशी पर्यायी महिलेला काम केलेल्या दिवसासाठी मेहनताना देण्यात यावा. या महिलांचे काम समाधानकारक नसल्यास त्यांच्या मध्ये बदल करण्याचे किंवा आळीपाळीने (Rotation) बदल करण्याचे अधिकार ग्रामपंचायतीला राहतील.पाळणाघराच्या मागणीनुसार ग्रामपंचायतीने एका पाळणाघरासाठी कमीत कमी १५ मुलांची यादी तयार करावी.

**२) उमेदवारांच्या निवडीसाठी अटी / शर्ती :** पाळणाघरात काम करणारी महिला किमान ८ वी पास असावी. तिचे वय २२ ते ४० वर्षे असे असावे. मुलांची काळजी घेण्याचा अनुभव असलेल्या महिलांना प्राधान्य देण्यात यावे. ८ वी पास महिला उपलब्ध नसेल तर उपलब्ध उमेदवारांपैकी सर्वात जास्त शिकलेल्या महिलेची निवड करण्यात यावी.मात्र ती स्थानिक रहिवाशी असावी व फक्त अनुसूचित जमाती (Schedule Tribe) महिलांची निवड करण्यात यावी.

**३) अंगणवाडीतून आहाराचा पुरवठा :** एकात्मिक बाल विकास सेवा योजनांतर्गत गावातील सर्व पात्र मुलांना रू.५/- प्रति दिवस प्रमाणे गरम ताजा आहार किंवा घरपोच आहार (THR) दिला जातो. सदर

आहार पाळणाघरातील मुलांनाही उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी पाळणाघर सेविकेची व स्थानिक अंगणवाडी सेविकेची राहील. पाळणाघरात येणा-या मुलांसाठी THR घरी पाठविण्या ऐवजी पाळणाघरातच पुरविण्यात यावा. एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत रू.५/- प्रति मूल प्रति दिवसाप्रमाणे (किंवा प्रचलित दराप्रमाणे) पूरक पोषण आहार पाळणाघरातील मुलांना व्यवस्थितपणे मिळत आहे किंवा कसे हे पाहण्याची तसेच टीएचआर च्या विविध पाककृती तयार करून मुलांना देण्याची जबाबदारी संबंधित पाळणाघर चालविणा-या महिलेची राहील.

४) **पाळणाघरातील आहाराचा पुरवठा :** पाळणाघरातील मुलांच्या आहार व इंधन यासाठी प्रति बालक प्रति दिन रू.८/- याप्रमाणे तरतूद अनुज्ञेय राहील. सदर तरतूदीमधून अंगणवाडीत देण्यात येत नाहीत अशा बाबींचा म्हणजेच दूध, केळी, स्थानिक फळे, शेंगदाणे, गोड भात, मोड आलेली कडधान्ये या वस्तुंचा पुरवठा करण्यात यावा.(आहाराच्या काही पाककृती अंगणवाडयांसाठी यापूर्वीच निश्चित करण्यात आल्या आहेत, त्याचा वापर करावा.) पाळणाघरात बालकांना देण्यात येणा-या आहाराची नोंद व बालकांची उपस्थिती याबाबतची नोंद स्वतंत्र नोंदवहीत ठेवण्यात यावी. आहाराचा निधी (रु.८/- प्रमाणे) पाळणाघर सेविकांना दिला जाईल व आहार पुरविण्याची जबाबदारी त्यांची राहील. त्यासाठी त्यांना स्वतंत्र शिधापत्रिका देण्याबाबत शासन स्तरावरून स्वतंत्रपणे आदेश निर्गमित करण्यात येतील. त्यानंतर त्यांनी गहू, तांदळाची खरेदी स्वस्त धान्य दुकानातून करावी.

५) **प्रत्येक पाळणाघरासाठी प्रति वर्षी रूपये १,००,०००/- (रूपये एक लाख फक्त) इतके अनुदान खालील बाबींसाठी मंजूर करण्यात येत आहे.**

१) आहार व इंधन यासाठी एका पाळणाघरात साधारणपणे २० मुले गृहीत धरून २५ दिवसांसाठी प्रति बालक प्रति दिन रूपये ८/- याप्रमाणे रू ४,०००/- इतका मासिक खर्च.

२) प्रत्येक महिलेसाठी प्रति महिना रू १६००/- प्रमाणे दोन महिलांसाठी रू ३,२००/- मजूरी.

३) पाळणाघरासाठी जागेचे भाडे, देखभाल व दुरूस्ती , सफाई , शौचालय व पाणी पुरवठा इत्यादीसाठी दरमहा रू ७००/- अनुज्ञेय राहील.

४) प्रशासकीय खर्चासाठी दरमहा रू २००/- अनुज्ञेय राहील.

५) आकस्मिक खर्च व आवश्यक साहित्य खरेदी करण्यासाठी वार्षिक रू २,८००/- अनुज्ञेय राहतील.

६) सदर पाळणाघरे उपरोक्त सहा आदिवासी जिल्हयातील आदिवासी उपयोजना क्षेत्रात घोषित केलेल्या गावांमध्ये सुरू करण्यात येतील.

७) याबाबत संबंधित प्रकल्प अधिका-याचे प्रमाणपत्र घेणे बंधनकारक राहील.

या योजनेची योग्य रितीने अंमलबजावणी करण्यासाठी वरील निकषामध्ये आवश्यक सुधारणा करण्याचे अधिकार संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद यांना राहतील.

**६) निधी वाटप :** प्रति पाळणाघर प्रति वर्षासाठी रूपये १,००,०००/- (अक्षरी रूपये एक लाख फक्त) इतके देण्यात येणा-या अनुदानापैकी प्रति पाळणाघर प्रति माह रूपये २००/- प्रशासकीय खर्चासाठी मंजूर केलेली रक्कम वगळून प्रति पाळणाघर पहिल्या टप्प्याच्या चार महिन्यासाठी रूपये ३२,२००/- इतके अनुदान ग्रामपंचायतीला देण्यात यावे.जानेवारी किंवा फेब्रुवारी २०१२ पर्यंत पाळणाघराचा सेटअप झाल्याची खात्री झाल्यावर जिल्हा परिषदेने १२ महिन्यापैकी पहिला हप्ता म्हणून रूपये ३२,२००/- आगावू रक्कम ग्रामपंचायतीच्या खात्यामध्ये लगेच जमा करावी. जेणेकरून वर्ष २०११-१२ मध्ये जास्तीत जास्त रक्कम खर्च होईल. त्यानंतर उर्वरित निधी दर चार महिन्यानी टप्प्या टप्प्याने अनुक्रमे रू ३२,२००/- व रू ३३,२००/- याप्रमाणे १२ महिन्यासाठी एकूण रूपये ९७,६००/- (अक्षरी रूपये सत्यान्नव हजार सहाशे फक्त ) ग्रामपंचायतीला आगाऊ उपलब्ध करून देण्यात यावा. ग्रामपंचायतीने प्रत्येक पाळणाघराचे स्वतंत्र बँक खाते उघडावे.त्यावर दोन्ही महिला Signatory राहतील, म्हणजेच दोन्ही महिलांच्या संयुक्त नावाने ग्रामपंचायतीने नविन खाते उघडावे. खातेदारांच्या बदलाबाबत ग्रामपंचायतीला अधिकार राहतील. मुलांच्या आहारासाठी आगावू रक्कम पाळणाघराला प्राप्त होईल याची संबंधित ग्रामपंचायतीने दक्षता घ्यावी.

**७) विविध स्तरावरील पर्यवेक्षण :** पाळणाघर योजनेवर प्रकल्प स्तरावर बाल विकास प्रकल्प अधिकारी व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण) जिल्हा परिषद आणि संबंधित आदिवासी विकास विभागाचे प्रकल्प अधिकारी यांनी पर्यवेक्षण करावे. तसेच या योजनेवर होणा-या खर्चाचा मासिक / त्रैमासिक / वार्षिक अहवाल संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी आयुक्त, महिला व बाल विकास पुणे आणि शासनास सादर करावा. स्थानिक पातळीवर ग्रामपंचायतीला पाळणाघरावर पर्यवेक्षण ठेवण्याचे अधिकार राहतील. मुलांना व्यवस्थितपणे आहार व इतर सेवा मिळत आहेत याचे संनियंत्रण करण्याचे अधिकार ग्रामपंचायतीला राहतील.

**८) मुलांचे वयोगट :** पाळणाघरात साधारणत: ६ महिने ते ३ वर्ष वयोगटातील मुलांना दाखल करण्यात यावे, मात्र अपवादात्मक परिस्थितीत ३ वर्षावरील मुलांनाही पाळणाघरात दाखल करण्याची परवानगी असावी.

**९) मुलांची सुरक्षा:** पाळणाघरात सर्व मुले सुरक्षित राहतील याची जबाबदारी ग्रामपंचायतीची राहील.पाळणाघरांना प्रशासकीय खर्चासाठी दरमहा रु. २००/- मंजूर करण्यात आले आहेत. सदर निधीतून पाळणाघर चालविणा-या महिलांना प्रशिक्षण देण्याबाबत संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी नियोजन करून मार्च, २०१२ अखेर पर्यंत प्रशिक्षण पुर्ण करावे.

**१०) निधीची उपलब्धता :** जिल्हयांच्या मागणीनुसार उपलब्ध तरतूदीच्या अधीन राहून निधी उपलब्ध करून देण्यात येईल. तथापि, सुरूवातीला ग्राम पंचायतीकडे व पंचायत समितीकडे असलेल्या निधीपैकी १०% निधी व स्थानिक देणगीव्दारे उपलब्ध झालेला निधी महिला व बालकल्याणासाठी खर्च करणे बंधनकारक आहे. पाळणाघराची मागणी निश्चित झाल्यानंतर लवकरात लवकर सबंधित जिल्हयांनी आयुक्त (महिला व बाल विकास ) यांना त्यांची आर्थिक मागणी कळवावी.

सदर योजना दिनांक १.१.२०१२ पासून किंवा पाळणाघर सुरू झाल्यापासून परंतु लवकरात लवकर राबविण्यात यावी. पाहिल्या टप्प्याच्या चार महिन्यांच्या कालावधीसाठी प्रति पाळणाघर रूपये ३३,०००/- या प्रमाणे ६०० पाळणाघरासाठी रूपये १,९८,००,०००/- (रूपये एक कोटी अठ्ठयानव लाख फक्त) इतका निधी आदिवासी उपयोजनेअंतर्गत मागणी क्र. टी-५ २२३६, पोषण आहार, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - ०२- पोषण अन्न व पेयें वितरण- ७९६- जनजातीक्षेत्र उपयोजना (०१) (०१) महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १२३ व २६१ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदान (२२३६०२९७) ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या लेखाशिर्षा खाली सन २०११-१२ साठी केलेल्या तरतूदीतून उपलब्ध करून देण्यात येत आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद यांचेकडून वरीलप्रमाणे पाहिल्या टप्प्याच्या चार महिन्यासाठी आवश्यक असलेल्या रकमेची मागणी प्राप्त झाल्यावर त्याप्रमाणे आयुक्त, महिला व बाल विकास यांनी आवश्यक रक्कम संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद यांना वितरीत करावी .तद्नंतर मुख्य कार्यकारी अधिकारी, हयांनी प्रति पाळणाघर प्रति माह रूपये २००/- प्रशासकीय खर्च वगळून उर्वरित रक्कम संबंधित ग्राम पंचायतीच्या खात्यामध्ये जमा करावी.

आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य , पुणे यांना सदरच्या खर्चासाठी "नियंत्रक अधिकारी " म्हणून आणि संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद यांनी झालेल्या खर्चाबाबतचे विनियोजन लेखा आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य , पुणे व आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांना विहीत कालावधीत सादर करणे बंधनकारक

राहील. त्याचप्रमाणे आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संभावित शिल्लक राहणा-या रक्कमेच्या विनियोगाबाबतचा प्रस्ताव शासनास तात्काळ सादर करावा.

सन २०१२-१३ या आर्थिक वर्षासाठी प्रति पाळणाघर वार्षिक रूपये १,००,०००/- (रूपये एक लाख फक्त) याप्रमाणे ६०० पाळणाघरांसाठी रूपये ६,००,००,०००/- (रूपये सहा कोटी फक्त) निधी संबंधित जिल्हा परिषदांना उपलब्ध करून देण्यासाठी आदिवासी विकास विभागाने तरतूद अर्थसंकल्पित करून आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडे संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद, यांचेकडे सुपूर्द करण्यासाठी वितरीत करण्यात यावा.सदर निधीचा योग्य विनियोग करण्याची जबाबदारी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद, यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१२०१०४१६२५३६४२००७ असा आहे.

सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( वन्दना कृष्णा )
प्रधान सचिव

मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, अल्पसंख्यांक विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, (व्यय) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव ,आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव ,सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, नवी मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग.
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय , नाशिक
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
ग्रंथपाल , महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधान भवन, मुंबई
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( बाल कल्याण), जिल्हा परिषद
सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण, आदिवासी आणि नागरी प्रकल्प) (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे मार्फत )
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, पुणे
सहाय्यक संचालक, (वित्त व लेखा) , महिला व बाल विकास , पुणे
नियोजन विभाग (का-१४७२) , मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (व्यय) मंत्रालय, मुंबई
महिला व बाल विकास विभागातील सर्व उप सचिव / अवर सचिव व कार्यासने मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (कार्यासन -५)